**मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे प्रश्न सोडविण्यासाठी त्रैमासिक / सहामाही आढावा बैठका घेणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : बीसीसी-२०११/प्र.क्र.४५५/११/१६-ब**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२ ,**
**दिनांक : ०३ मे, २०११**

**प्रस्तावना :** मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या विविध संघटनांमार्फत मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या अडी-अडचणी/प्रश्नांबाबत वेळोवेळी संबंधितांकडे पाठपुरावा केला जातो. त्यासाठी, साधारणपणे दर सहा किंवा तीन महिन्यांतून एकदा मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी संघटनांच्या प्रतिनिधींसोबत बैठका आयोजित करून त्यांच्या मागण्यांचा विचार करावा, अशा सूचना काही विभागांनी वेळोवेळी शासन निर्णय / परिपत्रकांद्वारे दिलेल्या आहेत. मात्र अशा सूचना देऊनही याबाबत ठोस कार्यवाही होत नसल्याचे, दि.१९/०४/२०११ च्या बैठकीत कास्ट्राईब कर्मचारी महासंघ, महाराष्ट्र राज्य या संघटनेने शासनाच्या निदर्शनास आणले आहे.

तसेच, मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचारी यांचे प्रश्न स्थानिक पातळीवरून पुरेशा गांभीर्याने न हाताळल्याने, बऱ्याचदा त्यांना दाद मागण्यासाठी वरीष्ठ अधिकाऱ्यांकडे जावे लागते. मात्र हे प्रश्न स्थानिक पातळीवर योग्य प्रकारे हाताळले गेल्यास, अशा अधिकारी / कर्मचाऱ्यांना वरिष्ठ स्तरापर्यंत येण्याची आवश्यकता भासणार नाही, असेही सदर संघटनेने शासनाच्या निदर्शनास आणले आहे.

उपरोक्त परिस्थिती विचारात घेता, यासंदर्भात राज्यातील सर्व कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुखांना सुस्पष्ट सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक:** मागासवर्गीय अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवाशर्ती, सेवाभर्ती, पदोन्नत्या, बदल्या, गोपनीय अहवाल यासारख्या संवदेनाशील बाबींवर अभ्यासपूर्वक व गांभिर्याने निर्णय घेण्याच्या दृष्टीने अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या हितासाठी कार्य करणाऱ्या संघटनांच्या प्रतिनिधींशी वेळोवेळी संवाद साधून त्यांचे प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने, प्रशासकीय विभाग प्रमुखांनी दर सहा महिन्यातून किमान एकदा, कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख यांनी तीन महिन्यांतून किमान एकदा किंवा आवश्यकता असेल तर त्यावेळी संघटनांच्या प्रतिनिधींशी चर्चा करून निर्णय घ्यावा. तसेच यापुढे मागासवर्गीय कर्मचाऱ्यांच्या प्रश्नांबाबत चर्चा करुन, त्यांचे प्रश्न स्थानिक पातळीवरच निकाली निघतील असे पहावे.

वरीलप्रमाणे केलेल्या कार्यवाहीचा अहवाल संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुखांना सादर करावा. या सर्व कार्यवाहीचा आढावा वर्षातून एकदा प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांचेमार्फत घेतला जाईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब-साईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक २०११०५०३१२३२१८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(रत्नाकर गायकवाड)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग
मुख्य सचिवांचे उप सचिव
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका
संचालक, समाजकल्याण, पुणे
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
संचालक, सेवायोजन, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व परीक्षा), मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग व कार्यालय प्रमुख
सर्व मंत्रालयीन विभाग
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
अध्यक्ष, कास्ट्राईब कर्मचारी महासंघ, ५६-बी, तपोवन कॉम्प्लेक्स, सोमलवाडा, वर्धा रोड, नागपूर-४४००२५.
निवड नस्ती, कार्यासन १६-ब.